**राज्यात ई-चलान प्रकल्प राबविण्यासाठी सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. केपीएमजी कंपनीस दि.०१.१०.२०२० ते दि.३१.०५.२०२१ या कालावधीकरीता केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी -३६१९/प्र.क्र.३६/भाग-१/पोल-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ४ मार्च, २०२२

**वाचा:**

१. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दिनांक : ०१.०७.२०१४, दि. २०.०३.२०१८ व दि.०९.०५.२०१९.
२. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि.२०.०५.२०१५.
३. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२३.०८.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४. गृह विभाग, कार्यादेश क्रमांक : टीआरए/१२१३/प्र.क्र.९/शिकाना/पोल-८, दि.०६.०९.२०१६.
५. गृह विभाग, शासन निर्णय क्र.३६१९/प्र.क्र.३६/पोल-३, दि.०७.०८.२०१९.
६. गृह विभाग, शासन निर्णय क्र.३६१९/प्र.क्र.३६/पोल-३, दि.२१.०९.२०२१.
७. मे. केपीएमजी प्रा.लि. यांचे देयक दि.१२.१०.२०२१.
८. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) यांचे पत्र क्र. ADGP(Tr.)/44/Reader/E-Challan/47, दि.०४.०१.२०२२.

**प्रस्तावना**

गृह विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासंदर्भात विविध निर्णय घेण्यासाठी गृह विभाग शासन निर्णय दि.२०.०५.२०१५ अन्वये प्रकल्प अंमलबजावणी समिती (PIC) स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि.२३.०८.२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये मे.केपीएमजी या कंपनीची राज्यात ई-चलान प्रकल्प राबविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून नेमणुक करण्यात आली आहे. त्यानुसार दि.०६.०९.२०१६ रोजीच्या कार्यादेशान्वये ई-चलान प्रकल्पाचा पहिला टप्पा कार्यान्वित करण्यासाठी मे. केपीएमजी कंपनीच्या एक प्रमुख सल्लागार अर्धवेळ, तीन वरीष्ठ सल्लागार पुर्णवेळ व दोन सल्लागार पुर्णवेळ तत्वावर याप्रमाणे दि.१०.०९.२०१६ ते दि.१०.११.२०१६ पर्यंत तसेच दोन वरीष्ठ सल्लागार पुर्णवेळ व एक सल्लागार पुर्णवेळ तत्वावर याप्रमाणे दि.११.११.२०१६ ते दि.१०.०१.२०१७ या

कालावधीसाठी कार्यादेश देण्यात आले आहे. तद्नंतर संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयानुसार दि.१०.०२.२०१७ ते दि.३०.०९.२०२० पर्यंत मे. केपीएमजी कंपनीस मुदतवाढ देण्यात आली. तद्नंतर संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयानुसार दि.०१.१०.२०२० ते दि.३१.०५.२०२१ पर्यंत एका वरिष्ठ सल्लागारास तसेच दि.०१.०६.२०२१ ते दि.३०.११.२०२१ पर्यंत एका वरिष्ठ सल्लागारास Quarterly Milestone तत्वावर मुदतवाढ देण्यात आली आहे. त्यानुसार मे. केपीएमजी कंपनीने राज्यातील ई-चलान प्रकल्पासाठी सद्यस्थितीत केलेल्या कामानुसार सदर कंपनीला दि.०१.१०.२०२० ते दि.३१.०५.२०२१ या कालावधीची देयके अदा करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

ई-चलान प्रकल्पासाठी मे. केपीएमजी कंपनीने दि.०१.१०.२०२० ते दि.३१.०५.२०२१ या कालावधीसाठी पाहिलेल्या सल्लागारांच्या कामासाठी रु.२६,१६,७६८/- (रुपये सव्वीस लाख सोळा हजार सातशे अडुसष्ट फक्त) इतक्या रकमेची देयके मे. केपीएमजी कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| # | Invoice Details | Billing Period | Resource Name | Resource Designation | Man-Month Rate as per DIT GR 09th May 2019 | Deployment (%) | Sub Total | GST (18%) | Total with taxes |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Tax Invoice No - KASP-MH/500477 Dated 12th Oct 2021 From Oct - 2020 to May -2021 | Oct-20 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 2 | | Nov-20 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 3 | | Dec-20 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 4 | | Jan-21 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 5 | | Feb-21 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 6 | | Mar-21 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 7 | | Apr-21 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| 8 | | May-21 | Raksha Pai | Senior Consultant | 277,200 | 100% | 277,200 | 49,896 | 327,096 |
| **Grand Total** | | | | | | | **22,17,600** | **3,99,168** | **26,16,768** |

अ) सदर रकमा या संदर्भात उपरोक्त नमुद शासन निर्णय क्र.१ अन्वये निश्चित केल्यानुसार ई-चलान प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) संदर्भ क्र.७ व ८ अन्वये मे. केपीएमजी कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार तसेच अपर पोलीस महासंचालक (वाहतुक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या पत्रानुसार सदर रकमा अदा करण्यात येत आहेत. सदर रकमांमध्ये दिनांक दि.०१.१०.२०२० ते दि.३१.०५.२०२१ या कालावधीसाठी १८% वस्तु व सेवा कर समाविष्ट करण्यात आला आहे.

क) ई-चलान प्रकल्पासाठी संबंधित कंपनीला सल्लागाराच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आहे, असे निदर्शनास आल्यास सदर जादा रक्कम संबधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

ड) सदर देयके आयकर व इतर प्रचलीत कर वजाती करून अदा करण्यात यावी.

२. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च "मागणी क्र.बी-१, २०५५ - पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. कोषागारातून निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (वाहतुक), मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अ.क्र.२७अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ अनुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी अनिवार्य खर्चाकरिता निधी वितरणास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४१७१०५८७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GAIKWAD KAILAS
ARJUN

Digitally signed by GAIKWAD KAILAS ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb,
pseudonym=98E519306D20397D354BD181099105F0AC1EFDEC,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04
D865CD, cn=GAIKWAD KAILAS ARJUN
Date: 2022.03.04 17:16:26 +05'30'

**( कैलास गायकवाड )**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत : माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी.

१. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक (वाहतुक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, व्यय-७ /वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मे. केपीएमजी ॲडव्हायझरी सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई.
११. अर्थसंकल्प शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती / पोल-३.